**मंठा, जिल्हा जालना येथील ३० खाटांवरुन ५० खाटांच्या श्रेणीवर्धीत उपजिल्हा रुग्णालय मुख्य इमारत बांधकाम व अधिकारी /कर्मचारी निवासस्थान बांधकामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२२/ प्र.क्र.२०२/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,

गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.

दिनांक : २६ जुलै, २०२३.

**वाचा :-** सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष- ३/टे-६/मंठा५०खाटामुइवइमाबांधकाम /५७२३-२४/२३, दिनांक २५.०४.२०२२.

**प्रस्तावना:-**

मंठा जिल्हा जालना येथील ३० खाटांवरुन ५० खाटांचे श्रेणीवर्धीत उपजिल्हा रुग्णालयाचे मुख्य इमारत बांधकामाचे रु.२५७८.७८ लक्ष व अधिकारी/कर्मचारी निवासस्थान बांधकामाचे बांधकामाचे रु.२१.४४.५९ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबातचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला होता. सदर प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाने तांत्रीक बाबी तपासून छाननीअंती मुख्य इमारतीसाठी रु. २५७१.७८ लक्ष व निवासी इमारतीसाठी रु.२१४४.५९ इतकी रक्कम परिगणित केली आहे. तदनंतर सदर प्रस्ताव मा. उच्चस्तरीय समितीसमोर सादर करण्यात आला असता उच्चस्तरीय समितीने दि.११.०७.२०२३ रोजीच्या बैठकीमध्ये मंठा जिल्हा जालना येथील ३० खाटांवरुन ५० खाटांच्या श्रेणीवर्धीत उपजिल्हा रुग्णालयाच्या मुख्य इमारत बांधकामाचे रु.२७.१० कोटी व अधिकारी/कर्मचारी निवासस्थान बांधकामाचे बांधकामाचे रु.२२.६० कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सहमती दर्शविली आहे. त्याअनुषंगाने मंठा जिल्हा जालना येथील ३० खाटांवरुन ५० खाटांचे श्रेणीवर्धीत उपजिल्हा रुग्णालयाचे मुख्य इमारत बांधकामाचे रु.२७.१० कोटी व अधिकारी/कर्मचारी निवासस्थान बांधकामाचे बांधकामाचे रु.२२.६० कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मंठा जिल्हा जालना येथील ३० खाटांवरुन ५० खाटांच्या श्रेणीवर्धीत उपजिल्हा रुग्णालयाचे मुख्य इमारत बांधकामाच्या रु.२७.१० कोटी व अधिकारी/कर्मचारी निवासस्थान बांधकामाच्या रु.२२.६० कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

२. उपरोक्त अंदाजपत्रकाची प्रशासकीय मान्यता पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तु विशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) सदर कामाच्या बांधकामाचा खर्च सार्वजनिक आरोग्य विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात यावा.

५) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमा-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

६) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

७) प्रस्तावित इमारत उपजिल्हा रुग्णालय अशी असून,त्याचे क्षेत्रफळ ५५९६.०० चौ.मी.असून बांधकामाचा दर २७०००/चौ.मी.आहे. तसेच अधिकारी/कर्मचारी निवासस्थान इमारतीचे क्षेत्रफळ ४९४५.५२ चौ.मी.असून बांधकामाचा दर रु.२७०००/चौ.मी. आहे.

८) प्रस्तावित करण्यात आलेल्या इमारतीचे जोते क्षेत्रफळ कर्मचारीवर्ग यांच्या अधीन अनुज्ञेय मानकाप्रमाणे असल्याची खातरजमा करण्याच्या अटीस अधीन राहून अंदाजित रु. २७.१० कोटी व अधिकारी /कर्मचारी निवासस्थान इमारतीसाठी रु. २२.६० कोटी इतक्या किंमतीस सहती दर्शविण्यात येत आहे.

३. सदर कामावरील खर्च मागणी क्रमांक- एच- ८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य)- ११०- रुग्णालये व दवाखाने, (१)(अ) -पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-इमारती, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१० ००१४ ), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ परिच्छेद क्र.१३४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१३१८२१३१३११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.07.26 17:46:30 +05'30'

**( अशोक मा. आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा ) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
४. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, जालना.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
९. निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.